परीभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना धारकांना सक्तीने सेवानिवृत्ती/ बडतर्फी/ सेवेतून काढून टाकणे इ. प्रकरणी अंशदान परतावा तसेच वसुली याबाबत करावयाची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अंनियो २०२१/प्र.क्र.१५/सेवा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१/१०/२००५
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००७/१८/सेवा-४, दि.७/०७/२००७
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००९/प्र.क्र.१/सेवा-४, दि.१२/११/२०१०
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंनियो १००९/प्र.क्र.२६/सेवा-४, दि.२८/०७/२०१७
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अंनियो-२०२१/प्र.क्र.१५/सेवा-४, दि.०१/०९/२०२१

**शासन परिपत्रक :-**

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्यांच्या, शासकिय सेवेतून सक्तीने सेवानिवृत्त/सेवेतून काढून टाकणे/बडतर्फ इत्यादी कारणास्तव सेवा समाप्त केल्यास अशा कर्मचाऱ्यांना त्यांच्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन खात्यावर जमा असलेल्या अंशदानाच्या एकूण रकमेचा परतावा त्यावरील व्याजासह देण्याबाबतच्या सूचना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दिनांक १२/११/२०१० व त्यासोबतची जोडपत्रे आणि संदर्भ क्र.४ येथील दि.२८/०७/२०१७ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. तथापि, सदर आदेशांमध्ये कर्मचाऱ्यांकडून येणे असलेल्या सर्व प्रकारच्या अग्रिम रकमांची वसुली व इतर शासकीय येणे असलेल्या वसुलीबाबतचा उल्लेख करण्यात आला नव्हता. यास्तव,या परिपत्रकान्वये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्यांच्या, शासकिय सेवेतून सक्तीने सेवानिवृत्त/सेवेतून काढून टाकणे/बडतर्फ इत्यादी कारणास्तव सेवा समाप्त केल्यास अशा शासकीय कर्मचाऱ्यांकडून येणे असलेल्या वसुलीच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१. शासनाच्या येणे असलेल्या सर्व प्रकारच्या अग्रिम रकमांची वसुली व इतर शासकीय येणे बाकी असल्यास सदर वसुली कर्मचाऱ्याच्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन खात्यामध्ये जमा असलेल्या परिभाषित अंशदानाची रक्कम व त्यावरील देय व्याजातून करण्यात यावी.

२. संबंधित कर्मचाऱ्याकडून शासनास झालेल्या आर्थिक हानीची (Pecuniary loss) जबाबदारी विभागीय चौकशीद्वारे अथवा न्यायालयीन चौकशी/दावा याद्वारे निश्चित झाल्यास त्याची वसुली संबंधित कर्मचाऱ्यांच्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन खात्यामध्ये जमा असलेल्या अंशदानाच्या परताव्याच्या रकमेतून करण्यात यावी.

३. हे परिपत्रक जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषीतर विद्यापिठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित महाविद्यालये तसेच कृषी विद्यापिठे इत्यादीमधील कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफरांसह लागू राहील. मात्र याबाबत स्वतंत्र आदेश संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही त्यांच्या स्तरावरुन करावी.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२१७१६२१०६९८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE

Digitally signed by RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=927f16b596a85f3f04b621916641eefd1bb6b4367c467eb0b061a30ce41ba8ec, pseudonym=AD5BA171C660951BA0BF959863A4808251FBFD58, serialNumber=175D8C74402686B296B9A00D70E6C51C0711C360974050D297FD3F96075BFCAE, cn=RAMAKANT SHIVAJIRAO GHATGE
Date: 2022.02.17 16:23:45 +05'30'

**(र.शि.घाटगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पूणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
८) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०) सह संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर.
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१२) सर्व कोषागार अधिकारी,
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
१५) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
१६) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१९) प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ न्याय शाखा) मुंबई,
२०) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई,
२१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
२२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२३) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग,
२८) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,
२९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०००३२.

३०) सर्व मंत्रालयीन विभाग

३१) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

३२) सर्व विभागीय आयुक्त,

३३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

३४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

३५) संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,

३६) संचालक (तंत्र शिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई,

३७) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

३८) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई,

३९) कुल सचिव, सर्व कृषि व कृषितर विद्यापीठे,

४०) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

४१) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.